राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास
दौरे ही १००% राज्य योजना सन २०१४-१५
मध्ये राबविण्यास वित्तिय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शेविदौ ४२१४/प्र.क्र.१३३/३-अे**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १२ सप्टेंबर,२०१४

*वाचा-*

1) **शासन निर्णय क्रमांकः शेविदौ-४२०७/प्र.क्र.१४५/३-अे, दिनांक ६ जून, २००७**
2) **शासन निर्णय क्रमांकः शेविदौ-४२११/प्र.क्र.३८/का.३ अे,दिनांक ९ मार्च,२०११**
3) **शासन समक्रमांक दिनांक १५ मे,२०१४ चा शासन निर्णय**
4) **शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०.१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७ एप्रिल,२०१४**

## *प्रस्तावना-*

राज्यातील शेतकऱ्यांचे केवळ उत्पादन व उत्पादकता वाढविणे हे ध्येय यापुढे न रहाता उत्पादित होणाऱ्या शेती मालाला चांगला दर्जा देऊन चांगला भाव मिळण्यासाठी नवीन तंत्रज्ञानाचा वापर शेतकऱ्यांनी त्यांच्या उत्पादनाकरिता करणे अत्यंत गरजेचे झाले आहे. शेतीशी निगडीत घटकांबाबत जगात वेळोवेळी होत असलेले बदल, विकसित होत असलेले तंत्रज्ञान हे शेतकऱ्यांपर्यन्त त्यांच्या गरजेनुरुप योग्यवेळी पोहोचविणे आणि त्यासाठी आवश्यक सहाय्य व सोयी सुविधा पुरविणे निकडीचे आहे. कृषि विस्तार कार्यक्रमाद्वारे शेतकऱ्यांना आधुनिक तंत्रज्ञानाची माहिती देण्याकरिता करावयाच्या विविध उपाय योजनांसाठी कृषि विभागाकडून विविधांगी प्रयत्न करण्यात येत आहेत.

त्या अनुषंगाने **"राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे"** आयोजित करणे ही योजना सन २००४-०५ पासून सुरु आहे. या योजनेचे उद्दिष्ट सफल होण्याच्या दृष्टिकोनातून संदर्भाधीन **क्र.१ च्या शासनान्वये दिनांक ६ जून, २००७ च्या** दिलेले मापदंड त्याचप्रमाणे **संदर्भाधिन क्र.२ च्या शासनान्वये दिनांक ९ मार्च,२०११ च्या पूरकपत्रान्वये** सुधारीत केलेल्या अनुदानानुसार ही योजना राबविण्यात येत आहे.सन २०१४-१५ मध्ये राबविण्यास **संदर्भाधिन क्र.३** च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली असून त्यापैकी लेखानुदानान्वये मंजूर रु.२३.३३ लक्ष (रु.तेव्वीस लक्ष तेहत्तीस हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देणे विचाराधीन आहे.

## शासन निर्णयः-

सन २०१४-१५ मध्ये राबविण्यास **संदर्भाधिन क्र.३** च्या शासन निणर्यान्वये रु.७०.०० लक्षच्या कार्याक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली असून वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ च्या दिनांक १७/४/२०१४ च्या परिपत्रकानुसार लेखानुदानान्वये मंजूर रु.२३.३३ लक्ष (रु.तेव्वीस लक्ष तेहत्तीस हजार फक्त) इतक्या तरतुदीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता या शासन निर्णयास देण्यात येत आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे पालन करावे. याबाबत खात्री करुन तसे प्रमाणित करावे. त्यानंतर प्रत्यक्ष निधी

खर्चासाठी उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

२) मंजूर केलेला रु.२३.३३ लक्ष (रु.तेव्वीस लक्ष तेव्वीस हजार फक्त) निधी खर्च आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे राज्यातील शेतक-यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे ही योजना **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) तथा राज्य नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.**

अ) परदेशातील अभ्यास दौऱ्यातील शेतकऱ्यांची निवड पारदर्शक असावी व निवडीमध्ये पुनरावृत्ती नसावी.

ब) वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र पुढील निधी वितरीत करण्यापूर्वी शासनास सादर करावे.

क) अभ्यास दौऱ्याच्या फलनिष्पतीबाबत प्रतिवर्षाचा एकत्रित अहवाल पुढील वर्षाच्या अभ्यास दौऱ्यास मान्यता देण्याच्या प्रस्तावासोबत शासनास सादर करावा.

३) राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे या योजनेच्या अंमलबजावणीकरिता मार्गदर्शक सूचना, नियम, निकष आणि अटी आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मान्यतेने निर्गमित कराव्यात.योजना अंमलबजावणी संदर्भात योग्य ती कार्यवाही करण्यास आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेवरील खर्च करण्यास व त्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) तथा राज्य नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.**

मागणी क्रमांक डी-३
२४०१-पीक संवर्धन,
१०९ विस्तार व प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजना)
१०९ (०१)(३९) शेतकऱ्यांचे देशाबाहेरील अभ्यास दौरे
(२४०१ ४३६५) ३३-अर्थसहाय्य

४) हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ दि.१७.४.२०१४ च्या परिपत्रकास दिलेल्या मान्यतेनुसार व मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१२२१५७९१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2014.09.12 12:16:22 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रत,

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव / मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. संचालक (आत्मा) तथा राज्य नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय, पुणे, (५ जादा प्रतींसह)
४. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे,
५. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
६. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
७. सर्व जिल्ह्यांचे कोषागार अधिकारी,
८. महालेखाकार (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर,
९. सर्व विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ, ,
१०.वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२,
११.नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई-३२,
१२.कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.निवड नस्ती.